**जिल्हा सांगली, तालुका कडेगांव येथील ढाणेवाडी व इतर ३ गावांना उरमोडी उपसा योजनेमधून पाणी पुरवठा योजनेस टंचाई निधीमधून निधी उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एससीवाय-२०१४/प्र.क्र.१९८/म-७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०६ ऑगस्ट, २०१४

**प्रस्तावना -**

सांगली जिल्ह्यातील कडेगांव तालुक्यातील ढाणेवाडी, उपाळे- मायणी, खेराडे वांगी व येतगांव या ४ गावांना उरमोडी उपसा सिंचन योजने मधून पाणी पुरवठा करण्याबाबच्या ढोबळमानाने रू.१५५०.०० लक्ष चा प्रस्ताव जिल्हाधिकारी, सांगली व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद, सांगली यांनी विभागीय आयुक्त, पुणे यांना सादर केलेला आहे. सदर योजना टंचाई निधीतून घेण्याबाबतच्या प्रस्तावास मंत्रिमंडळ उप समितीच्या दिनांक २२.७.२०१४ च्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रस्तावाबाबत जिल्हाधिकारी, सांगली व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , सांगली यांनी विभागीय आयुक्त, पुणे यांना केलेली शिफारस विचारात घेता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

जिल्हा सांगली, तालुका कडेगांव येथील ढाणेवाडी, उपाळे- मायणी, खेराडे वांगी व येतगांव या ४ गावांना उरमोडी उपसा सिंचन योजने मधून पाणी पुरवठा करण्याबाबतच्या रू.१५५०.०० लक्ष इतक्या किमतीच्या योजनेस टंचाई निधीमधून निधी उपलब्ध करून देण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

संबंधित विभागाने सदर योजनेस प्रशासकीय मान्यता घेतल्यानंतरच निधी मुक्त करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४०८०६१७०४३८९८१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh Shankarrao Bokade

Digitally signed by Suresh Shankarrao Bokade
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Shankarrao Bokade
Date: 2014.08.06 17:04:16 +05'30'

(सु.शं.बोकडे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, पुणे.
५. जिल्हाधिकारी, सांगली.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सांगली.
७. कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
८. मुख्य अभियंता, कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
१०. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
११. महालेखापाल १ / २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१२. संचालक लेखा व कोषागारे मुंबई.
१३. वित्त विभाग (व्यय-९/ अर्थसंकल्प-६), मंत्रालय, मुंबई
१४. अवर सचिव (म-३/म-११) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती कार्यासन- म-७

प्रतिलिपी माहितीसाठी-

१. मा.मुख्यमंत्री व मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा.मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३. मा.मुख्य सचिवांचे, स्वीय सहाय्यक